महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाच्या मार्फत राष्ट्रीय कृषि विकास योजनेतुन प्रकल्पांना प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत
मुंबई-नागपूर शिघ्रसंचार मार्गावर (महाराष्ट्र समृध्दी मार्ग) महामंडळातर्फे गोदाम/शितगृह उभारणी करणे.

महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
शासन निर्णय क्रमांकः :- वखार१४१७/प्र.क्र.१४२/९-स
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक २३ ऑगस्ट, २०१७

वाचा :-

राष्ट्रीय कृषी विकास योजनेच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीची २३ वी बैठकीचे इतिवृत्त शासन पत्र क्र. RKV ०३१७/C.R.१४/RKVY CELL, दि. ९.६.२०१७

प्रस्तावना :-

राष्ट्रीय कृषि विकास योजनांतर्गत केंद्र शासनाने प्रसिद्ध केलेल्या मार्गदर्शक सुचनांनुसार मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांच्या अध्यक्षतेखाली दि. २० सप्टेंबर, २००७ च्या शासन निर्णयान्वये राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समिती (SLSC) गठीत करण्यात आलेली आहे. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीची २३ वी बैठक दि. २५ मे, २०१७ रोजी पार पडली. या बैठकीमध्ये महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ मार्फत मुंबई - नागपूर द्रुतगती मार्गावर (महाराष्ट्र समृध्दी मार्ग) शेतीमाल साठवणूकीसाठी सदर महामार्गालगत पायाभूत सुविधा निर्माण करण्यासाठी नाशवंत कृषि माल साठवणूकीसाठी पुलगांव, कारंजा घाटगे, झगडेफाटा, लासूर, धामणगांव, वडगांव या ६ ठिकाणी केंद्रावर प्रत्येकी ३००० मे.टन साठवणूक क्षमतेची गोदामे व नाशवंत कृषीमाल साठवणूकीसाठी पुलगांव, लासूर व झगडेफाटा या ३ ठीकाणी Multi Temperature शितगृह सुविधा विकसित करण्याच्या प्रकल्पासाठी रू. २४.६० कोटींचे अनुदान मंजूर करण्याचे राष्ट्रीय कृषि विकास योजनेतंर्गत निश्चित केलेले असून, राष्ट्रीय कृषि विकास योजनेकडून सन २०१७-१८ साठी मंजूर करण्यात आलेल्या रू. १.०० कोटींच्या अनुदान खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासन स्तरावर विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

०१. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि. २५ मे, २०१७ रोजी संपन्न झालेल्या राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या २३ व्या बैठकीत मंजूर करण्यात आलेल्या, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ मार्फत मुंबई - नागपूर द्रुतगती मार्गावर (महाराष्ट्र समृध्दी मार्ग) शेतीमाल साठवणूकीसाठी सदर महामार्गालगत पायाभूत सुविधा निर्माण करण्यासाठी पुलगांव, कारंजा घाटगे, झगडेफाटा, लासूर, धामणगांव, वडगांव या ६ समृद्धी केंद्रावर प्रत्येकी ३००० मे.टन साठवणूक क्षमतेची गोदामे व पुलगांव, लासूर व झगडेफाटा या ३ समृद्धी केंद्रावर प्रत्येकी १००० मे.टन साठवणूक क्षमतेची Multi Temperature शितगृह सुविधा विकसित करण्याच्या रू. २४.६० कोटींच्या प्रकल्पास व राष्ट्रीय कृषि विकास योजनेकडून सन २०१७-१८ साठी मंजूर करण्यात आलेल्या प्रकल्पासाठी रू. १.०० कोटींच्या अनुदान खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर अनुदान हे Integrated Scheme for Agricultural Marketing यांच्या खर्च निकषांनुसार राहील.

०२. सदर कामांचा CSR/DSR व बाजार दरानुसार अंदाजित खर्च व अनुदान यातील फरकाची रक्कम महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ स्वत:च्या निधीतून भागवेल. सदर प्रकल्पाअंतर्गत मंजूर गोदाम बांधकामाची ठिकाण निहाय निर्माण होणाऱ्या साठवणूक क्षमतेची माहिती सोबत जोडलेल्या परिशिष्ट “अ” मध्ये नमूद करण्यात आली आहे. सदर प्रकल्पाचा घटकनिहाय अनुदानाचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | तपशील | RKVY अंतर्गत मंजूर अनुदान (रु.कोटी) | RKVY अंतर्गत मंजूर अनुदान (रु.कोटी) | |
|---|---|---|---|---|
| | | | सन २०१७-१८ | सन २०१८-१९ |
| १ | सहा ठिकाणी एकूण १८००० मे.टन क्षमतेचे गोदाम बांधकाम | १२.६० | ०.५० | १२.१० |
| २ | तीन ठिकाणी एकूण ३००० मे.टन क्षमतेचे शितगृह प्रकल्प | १२.०० | ०.५० | ११.५० |
| | **एकूण** | २४.६० | **१.००** | **२३.६०** |

०३. सदर शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेला प्रकल्प रक्कम रू. २४.६० कोटींच्या खर्चासाठी पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

१) महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाने सदर सर्व कामांचे नियमांनुसार खर्चाचे अंदाजपत्रके व नकाशे तयार करून घेऊन नियमित पद्धतीनुसार कामांस प्रशासकीय मान्यता द्यावी.

२) सदर प्रकल्प/योजना राबविण्यासाठी महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ अमंलबजावणी यंत्रणा म्हणून काम पाहील. संबंधीत यंत्रणांनी सदर प्रकल्प/योजना राबविताना त्याची अमंलबजावणी, संनियंत्रण आणि मुल्यमापन करणेबाबत आवश्यक तो समन्वय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांच्याशी ठेवावा. तसेच वेळोवेळी प्रकल्प अंमलबजावणी विषयक आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल पणन विभागास सादर करावा.

३) महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाचे अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक यांनी समिती गठीत करून, प्रकल्पांच्या आर्थिक व भौतिक उद्दिष्टांचा आढावा घ्यावा.

४) वरील प्रकल्प / योजनांची अमंलबजावणी संनियंत्रण व मुल्यमापन केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या निकषांनुसार अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ यांनी करावे.

५) या प्रकल्पाकरीता उपलब्ध करून देण्यात आलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ यांच्या स्वाक्षरीने किंवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्याच्या स्वाक्षरीने कृषि विभागास सादर करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०८२३१५२०१७४२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahendra S Pujari

Digitally signed by Mahendra S Pujari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8b5a303a1aac7ca1cc574b4617cc25b1634df3f64ec897959300a5d5688c1454, cn=Mahendra S Pujari
Date: 2017.08.23 15:09:45 +05'30'

**(महेंद्र पुजारी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत**

१. मा. विरोधी पक्ष नेते विधानसभा व विधानपरिषद

२. सर्व मा. विधानसभा व विधानपरिषद सदस्य
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यपाल यांचे सचिव
५. सर्व मा. अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. प्रधान सचिव (कृषि व पणन) मंत्रालय, मुंबई.
७. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वखार महामंडळ, पुणे.
८. उप सचिव (पणन), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. महालेखापाल, महाराष्ट्र ½ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१०. कक्ष अधिकारी, राकृवियो/६अे/७अे, कृषी व पदुम विभाग
११. निवड नस्ती

शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक वखार१४१७/प्र.क्र.१४२/९-स,
दिनांक :-२३/०८/२०१७ चे सहपत्र

**परिशिष्ट अ**

महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ मार्फत मुंबई—नागपूर द्रुतगती मार्गावर (महाराष्ट्र समृध्दी मार्ग) शेतीमाल साठवणूकीसाठी महामार्गालगत पायाभूत सुविधा निर्माण करण्यासाठी नाशवंत कृषि माल साठवणूकीसाठी बांधकामाची ठिकाणे व साठवणूक क्षमता.

| अ.क्र. | ठिकाण | जिल्हा | गोदामे क्षमता (मे.टन) | शितगृह क्षमता (मे.टन) |
|---|---|---|---|---|
| १ | पुलगाव | वर्धा | ३००० | १००० |
| २ | कारंजा (घा.) | वाशिम | ३००० | निरंक |
| ३ | लासूर | औरंगाबाद | ३००० | १००० |
| ४ | झगडे फाटा | औरंगाबाद | ३००० | १००० |
| ५ | धामणगांव | अमरावती | ३००० | निरंक |
| ६ | वडगांव | नागपूर | ३००० | निरंक |
| **एकूण** | | | **१८०००** | **३०००** |